# सुरेश भट यांची गझल आणि गझलियत

*' समझ सकते हो तो समझ मेरे इन इशारोंसे*
*जो समझाने से समझो तो बात बात क्यां ? '*
**- श्रीधर**

चौथ्या नवतेचा शोध हा लेख लिहिल्यानंतर त्याच्यावर उलटसुलट चर्चा होण्याची शक्यता वाटत होती. त्या लेखात भटांच्या गझलेविषयी लिहिताना मी म्हटले होते,

'ठोस आशयाच्या अभावी अनेकांनी सुरेश भटांनी निर्माण केलेला गझलेचा सोपा आकृतिबंध गिरवायला सुरुवात केलेली दिसते. त्यात खावर, म. भा. चव्हाण यांचा अपवाद वगळता इतरांच्या गझला ह्या आशयाच्या ठराविक गिरमिटात फिरताना दिसतात. ह्याला कारण भटांनी बोकाळून ठेवलेला गझलियतचा आग्रह आहे. भटांच्या 'गझलियत' संकल्पनेत ज्या बसतील त्या गझला व बाकीच्या फसलेल्या कविता असा एक अपप्रचार जाणीवपूर्वक पंथवादी भूमिकेतून केला गेलेला दिसतो. त्यामुळे अनेकांना उर्दूत रूढ होऊ पाहत असलेल्या मुक्त गझलेविषयी काडीचीही माहिती नाही. त्यामुळे एखाद्याने मुक्त गझला लिहिल्या की त्यावर तुटून पडायला ही माणसे तयार दिसतात. त्यातच गझलेत आधुनिक जीवनाची, त्यातून व्यक्त होणाऱ्या आशयाची व्यामिश्रता व्यक्त होणे अशक्य आहे. एका शेरात ही गुंतागुंत पकडताच येत नाही; पण गझलेची मर्यादा सुरेश भटांनाच नीट कळलेली दिसत नाही तिथं त्यांच्या शिष्यवरांना ती कळेल असं आज तरी वाटत नाही. भटांनी आमच्या पिढीचं जेवढं नुकसान केलं तेवढ कुणीच केलं नसेल.' (त्यांच्या गझलेविषयी पूर्ण आदर ठेवून हे विधान करावेसे वाटते.)

भटांच्या चाहत्यांनी ह्या टीकेला तिखट प्रतिक्रिया नोंदवल्या आणि अद्यापही नोंदवत आहेत. ह्या प्रतिक्रियांचे संघटित स्वरूप सुरेखा बरकले यांनी अक्षर चळवळला लिहिलेल्या पत्रातून अतिशय सुरेख रूपात प्रकट झाले आहे.

ह्या सर्व पार्श्वभूमीवर सुरेश भटांच्या गझलेची, त्यांच्या गझलविषयक विचारांची आणि आमच्या सारख्या टीकाकारांवर ह्या समुदायाकडून होणाऱ्या टीकेची कठोर छाननी आवश्यक आहे असे वाटते, ही छाननी करताना मी शक्यतो टीका करण्यासाठी माझ्याच गझला निवडल्यात; कारण दुसऱ्यांच्या गझलांच्या मर्यादा दाखवल्या तर भटकुलांचे एक उत्तर तयार असते. 'तुला

आमची गझल कळलीच नाही.' तेव्हा स्वत:च्याच गझलांच्या साहाय्याने दोष मांडले तर बरे ठरेल असे वाटते. ही टीका करतानाच माझे गझलेविषयीचे म्हणणे आपोआपच मांडले जाईल असे वाटते.

'खळबळजनक विधाने करण्याकडे कल' हा माझ्या समीक्षेवर सर्वांचाच आरोप आहे. मी इथे एकच सांगतो, मी फक्त विधाने करतो; मात्र ती करताना ठामपणे करतो. उगाच लेचेपेचेपणा माझ्या स्वभावाला मानवत नाही. माझी मते स्पष्ट आहेत. ती कुणाला 'खळबळजनक' वाटत असतील तर हे वाटणे 'वाटणे' आहे आणि तसे वाटण्याचा अधिकार त्या व्यक्तीला आहे. मात्र समीक्षकाने नुसते ब्लॉटिंग पेपर असू नये. आपली स्वत:ची म्हणून काही मूल्ये असतील तर ती ठाम मांडावीत ह्या भालचंद्र नेमाड्यांच्या मतात थोडासा बदल करून मी म्हणेन की, समीक्षकाने ब्लॉटिंग पेपर असू नये, त्याने आपली स्वत:ची मते ठामपणे मांडावीत. 'मूल्ये' हा शब्द मला फार मोठा वाटतो आणि तो वापरण्याची पात्रता माझ्यात नाही. ह्या देशात स्वत:ची मूल्ये प्रामाणिकपणे जपणारा व त्यासाठी ठामपणे वेळप्रसंगी प्राण देऊ शकणारा माणूस मला अद्याप दिसलेला नाही. मराठी साहित्यिकांनी ह्याबाबतीत फारशी फुशारकी मारू नये. असो.

'मी सुरेश भटांच्या कर्तृत्वाचा उल्लेख टाळला' असे सर्वांना वाटते. लेखाचा मूळ हेतू लक्षात घेतला तर ह्या मताला फारसा अर्थ उतर नाही. तो लेख व्यक्तिगत कर्तृत्वाला महत्त्व न देता नवतांना महत्त्व देणारा होता हे सर्वांनी लक्षात घ्यावे. त्या लेखात मी एक विधान केले आहे. ''सुरेश भटांच्या गझलेविषयी पूर्ण आदर ठेवून हे विधान करावेसे वाटते.'' दुर्दैवाने ते विधान छापताना गझलेऐवजी गझलतेविषयी अशी चूक झाली आहे; पण नीट वाचणाऱ्या माणसाला तिथे गझल हा शब्द अभिप्रेत असणार हे सहज कळेल; कारण लेखातील माझी सर्व भटांविषयीची विधाने ही गझलतेविषयीच्या त्यांच्या दृष्टिकोनाला विरोध करतांना आढळतात. मी जेव्हा भटांच्या गझलेविषयी पूर्ण आदर राखतो तेव्हाच त्यांच्या कर्तृत्वाला मान्यता देतो. अन्यथा भटांविषयी आदर मी का दाखवेन? ह्या संदर्भात भटांच्या काही शिष्यांनी मला भेटून तीव्र नापसंती व्यक्त केली आहे. तेव्हा ह्या संदर्भात अधिक स्पष्टीकरण देणे मला गरजेचे वाटते.

सुरेश भटांच्या अस्तित्वाचे तीन भाग आहेत.

(१) सुरेश भट एक व्यक्ती म्हणून, (२) सुरेश भट एक कवी म्हणून, (३) सुरेश भट एक समीक्षक म्हणून.

माझे सुरेश भटांशी जे मतभेद आहेत ते त्यांच्या समीक्षक ह्या भागाविषयी. सुरेश भटांचा

आणि माझा वैयक्तिक परिचय तीन भेटीपलीकडे नाही आणि त्यातील श्रीराम पचिंद्रे यांच्या घरी झालेली भेट हीच फक्त दीर्घ भेट होती. मला भट त्यावेळीही व्यक्ती म्हणून आवडले होते आणि आजही आवडतात. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा जोमदारपणा, कलंदरपणा आणि गझलेविषयीचे त्यांचे प्रेम ह्याविषयी मला आजही आस्था वाटते आणि आदरही वाटतो. तेव्हा आमचे मतभेद हे व्यक्तिगत नाहीत हे ध्यानात येणे अत्यंत आवश्यक आहे. काहींनी तसा संशय व्यक्त केल्यामुळे हे सांगावे लागते.

सुरेश भटांचे कवी म्हणून असलेल्या स्थानाविषयी बोलणे ही नाजूक आणि अवघड बाब आहे. एखादा कवी श्रेष्ठ की कनिष्ठ हें मत शेवटी वैयक्तिकच राहते असे मला वाटते. कारण एखाद्या कवीने मला किती समृद्ध केले हे शेवटी माझ्या व्यक्तिमत्त्वावरच व वाढीवरच ठरते. तरीही मी जास्तीत जास्त तटस्थपणे लिहिण्याचा प्रयत्न करतो. मराठीतं सर्वोत्कृष्ट हायकू कार कोण ? सर्वोत्कृष्ट सुनीतकार कोण? हे ठरवणे अत्यंत अवघड जाते; पण मराठीतील सर्वोत्कृष्ट गझलकार म्हणून सुरेश भटांचे नाव घेताना माझ्या मनात कसलाही किंतू येत नाही. मराठीत सर्वसाधारणपणे जी गझल लिहिली गेली ती भावगीताचा एक वेगळा प्रकार म्हणून ! त्यामुळे माधव ज्यूलियनांपासून विन्दा करन्दीकर यांच्यापर्यंत गझल ही एक सलग भाववृत्ती आविष्कृत करत असे. ह्याला खणखणीतपणे पहिला छेद दिला तो सुरेश भटांनीच. गझल ही पूर्वी केवळ वृत्त म्हणून अस्तित्वात होती. भटांनी तिला वृत्ती दिली. मात्र भटांनी तिची वृत्तप्रधानता ही देखील प्रमाण मानून तिला बन्दिस्तपणाही दिला. भटांचे हे कर्तृत्व मलाही मान्य आहे; पण कवी म्हणून त्यांचे श्रेष्ठत्व त्यातून सिद्ध होते का? एखाद्या कवीने एखादा प्रकार सरस हाताळला ह्यावरून तो कवी म्हणून श्रेष्ठ ठरतो का?

भट जर श्रेष्ठ कवी असतील तर हायकू लिहिणाऱ्या कवयित्रींना श्रेष्ठ कवयित्री का मानू नये ? प्रत्यक्षात भटांचे शिष्य जो दर्जा भटांना देतात तो ह्या कवयित्रींना देत नाहीत. ह्यामागे कारण असे आहे की भटांचा आशय हा अधिक वजनदार, प्रतिभासंपन्न आहे असे त्यांना वाटते. हाच न्याय जर भटांना दिलीप चित्रे, अरुण कोलटकर, नामदेव ढसाळ वगैरे प्रभृतीसंदर्भात लावला तर काय दिसते ? विसाव्या शतकातील संवेदनांची जटिलता, जीवनाचे सर्वांगीण तपशीलवार आकलन, आत्मभानापासून समाजभानापर्यंत जाणिवांचा विस्तारलेला फलक, आशयाची सूक्ष्मता व आयामता आदी बाबतीत भटांच्या काव्याची तुलना ह्या कवींशी केली तर भटांची मर्यादा स्पष्टपणे जाणवते. भटांच्या कवितेत जो रोमॅन्टिक आशय आढळतो तो त्यांचा स्वत:चा आहे; पण त्यामागील संवेदना मराठीत त्यांच्यापूर्वी बोरकर, पाडगावकर यांनी व्यक्त केली आहे.

ना. घ. देशपांडे आणि ना. धों. महानोर तर ह्या बाबतीत फार पुढे गेलेत. नामदेव ढसाळ, यशवंत मनोहर, चंद्रकांत पाटील, वसंत डहाके यांचे सामाजिक वास्तवाचे भान व आकलन इतके दीर्घपल्ली, बहुआयामी, सर्व सूक्ष्म स्तर कवेत घेणारे आहे की भटांचे सामाजिक वास्तवाचे भान त्यापुढे फारच कमकुवत वाटते. ही मर्यादा भटांची आहे का ? ह्याचा आपण विचार केला की मग लक्षात येते की, ही मर्यादा भटांची नाही, तर त्यांनी जो काव्यप्रकार निवडला त्याची आहे. सुरेश भट जीवनाची स्थूलता अतिशय प्रभावीपणे व्यक्त करतात. पण सूक्ष्मतेची मात्र वानवाच असते. सामाजिक व वैयक्तिक संबंधांतील जटिलता व सूक्ष्मता त्यांना चांगलीच कळते. पण हे सगळे आकलन एका शेरात व्यक्त करायचे असल्याने त्याची अभिव्यक्ती चटकदार पण ढोबळ होते. हे केवळ भटांबाबतच नव्हे तर गालिबपासून निदा फाजिलीपर्यंत सर्वच गझलकारांबाबत जाणवते. (गालिब किंवा इकबाल हे महाकवी आहेत ते त्यांच्या गझलांमुळे नव्हेत तर त्यांनी इतर काव्यप्रकारांत जी विलक्षण कामगिरी केली त्याबद्दल. भटांना अशा प्रकारची कामगिरी करता आलेली नाही इथेच त्यांच्या प्रतिभेची मर्यादा दिसते.) आधुनिक युगातला मुक्तछंद त्यांना अजिबात जमलेला दिसत नाही. याउलट इकबाल किंवा गालिब यांनी इतर काव्यप्रकारात तितकीच तोलामोलाची कामगिरी करून आयुष्याची संपूर्णता व्यक्त केली. त्यामुळेच भट ह्यांना मी मराठीतील सर्वश्रेष्ठ गझलकार मानतो; पण श्रेष्ठ कवीचे बिरुद त्यांना लावणे मला तरी शक्य वाटत नाही. ते एक चांगले कवी आहेत असे निश्चित मानता येते. हे सगळं इतकं विस्तारानं लिहिण्याचं एकमेव कारण सुरेश भटांच्या कर्तृत्वाविषयी मला काय वाटते ते स्पष्ट व्हावे हे आहे.

सुरेश भटांविषयी माझा मुख्य आक्षेप आहे तो भटांनी स्वत:ची गझलियतविषयक एक संकल्पनात्मक चौकट मांडली आहे तिला आणि ह्या चौकटीत बसल्या तरच त्यांना गझला म्हणाव्यात नाहीतर मानू नये-ह्या त्यांच्या भूमिकेला. इथे भट आपली गझलेविषयीची चौकट लादतात असे मला वाटते. उदाहरणार्थ, गझल ही किमान पाच शेरांची असायला हवी हा त्यांनी आखून दिलेला नियम. ह्या नियमानुसार कुणीही चार शेरांची गझल लिहिली तरी ती गझल होत नाही असे भट यांचे म्हणणे. ह्याच नियमाला प्रमाण मानून त्यांचे शिष्य व बहुधा भटही मंगेश पाडगावकरांच्या चार शेरांच्या गझलेला गझल मानत नाहीत. माझा आक्षेप त्यांच्या आग्रहाला आहे. कारण ह्या आग्रहामागे कोणतेही सुसंगत तर्कशास्त्र दिसत नाही. केवळ परंपरा म्हणते म्हणून पाच शेर असे दिसते. वास्तविक पाच किंवा चार ह्याला कितपत अर्थ आहे? मला हा निव्वळ मूर्खपणा वाटतो; कारण मग किमान पाचच का ? किमान सहा का नाही? असा प्रश्न सहज उपस्थित होतो. म्हणूनच भटांचा हा नियम, ही चौकट मला मान्य नाही. कारण तिचा

गझलेच्या आशयाशी किंवा गझलियतेशी काडीचाही संबंध नाही. चार शेरांची गझल ही देखील गझलच होय, असे मला वाटते. प्रत्यक्षात भटांनी आखून दिलेल्या पाच शेरांच्या नियमाचा आधार घेऊन मंगेश पाडगावकरांच्या चार शेरांच्या गझलांना गझल म्हणणे नाकारणे ही भूमिका पंथवादी भूमिका आहे असे मला वाटते.

सुरेश भटांचा - गझल ही वृत्तातच असली पाहिजे - हा एक गझलेविषयी दुसरा नियम. ह्या नियमानुसार एखाद्या शेरात पहिली ओळ.२६ मात्रांची व दुसरी ओळ २४ मात्रांची असेल तर ती शेर शेर व अशा शेरांची मालिका ही गझल होऊ शकत नाही. माझ्या मते मात्रांचे हे बंधन काटेकोरपणे पाळणे अनेकदा अभिव्यक्तीचा मुक्तपणाच घालवून बसते व अनेकदा आशय पातळ व विरविरीत करायला कारणीभूत ठरते. असे हे बंधन मुक्तछंदाच्या जमान्यात पाळणे मला तरी गरजेचे वाटत नाही. कुणी पाळत असला तर ठीक; पण कुणी पाळत नसेल तर त्याच्या गझलांना गझल न म्हणणे व त्याची मान्यता नाकारणे हे पंथवादाचेच लक्षण होय. वास्तविक गझल वाचताना किंवा ऐकताना आपण काही मात्रा मोजत ती अनुभवत नसतो. मी स्वत: माझ्या अशा गझला ऐकवल्या आहेत आणि हा मुक्तपणा स्वीकारल्याने प्रत्यक्ष गझलानुभवात काडीचाही फरक पडत नाही हा माझा अनुभव आहे. मग जर हा मुक्तपणा गझलियतच्या आड येत नसेल तर अशा गझला 'गझल' म्हणून का स्वीकारू नयेत ? भटांना अशा प्रकारच्या गझला ह्या गझल म्हणून मान्य आहेत का ? मला वाटते त्यांना हे मान्य नाही. कारण गझल ही पारंपरिक चौकटीतच धावली पाहिजे हा त्यांचा आग्रह आहे. या गझलांना मी जेव्हा मुक्त गझला म्हणतो तेव्हा त्या प्रथम गझला आहेत हे मान्य झालेले असते; कारण मुक्त हे विशेषण आहे. काळा माणूस, गोरा माणूस, हडकुळा माणूस ह्यामध्ये काळा, गोरा आणि हडकुळा ही विशेषणे आहेत आणि इथे त्या व्यक्तींना प्रथम माणूस म्हणून मान्यता दिल्यानंतर मग ही विशेषणे वापरली गेलीत. भटांना मुक्त गझल ह्या मुळात गझला म्हणून मान्य आहेत का ? माझ्या माहितीप्रमाणे त्यांना हे मान्यच नाही. इथेच त्यांच्या भूमिकेला माझा ठाम आक्षेप आहे. तेव्हा 'नव्या मुक्त गझलचे नवे नामकरण करावे, पण स्वत:च्या कोणत्याही रचनेला गझलमध्ये समाविष्ट करण्याचा अट्टाहास करू नये, हा भट संप्रदायाचा सल्ला वरकरणी चांगला वाटला तरी त्यांना गझलमध्ये समाविष्ट करण्याचा अट्टाहास करू नये, असे म्हणून त्यांची गझला म्हणून मान्यता साळसूदपणे काढून घेणारा आहे. ह्या गझला प्रथम गझला आहेत, नंतर मुक्त आहेत. म्हणूनच त्यांना गझला म्हणून मान्यता मिळायलाच हवी अशी माझी ठाम भूमिका आहे. ही भूमिका घेण्याचे मुख्य कारण गझलेच्या गझलियतमध्ये त्यामुळे काही फरक पडत नाही हे आहे.

गझलेची गझलियत कशात आहे? ती मात्रात नाही तशीच शेरांच्या संख्येतही नाही. माझ्या मते गझलेची गझलियत ही तिच्या कोलाजचित्रणात आहे. ज्याप्रमाणे कोलाज करताना वेगवेगळे तुकडे एकत्र येऊन त्यातून निर्मितीचा एकसंध डोलारा निर्माण होतो व तो एकात्म प्रत्यय देतो त्याचप्रमाणे गझलेत वेगवेगळे मूड (भावछटा) एकत्र येतात आणि ते स्वत:चे स्वतंत्र अस्तित्व कायम ठेवून एकात्म प्रत्यय देतात. कवितेत एका मूडचा दुसऱ्या मूडशी संबंध असावाच लागतो. अन्यथा ती कविता विस्कळीत होते, तसे गझलेत होत नाही. इथे वेगवेगळे मूड सुखाने एकत्र नांदताना दिसतात. एखाद्या वाद्यवृंदात जसे प्रत्येक वाद्य वेगळे असते तसा इथे प्रत्येक शेर वेगळा असतो आणि तरीही त्यातून अनुभवाचा येणारा प्रत्यय एकात्म असतो. ज्यात गझलेचे हे बहुआयामित्व असते तीच खरी गझल होय. भटांच्यापूर्वी लिहिल्या गेलेल्या अनेक गझलांत हे बहुआयमित्व नाही. पाडगावकरांच्या अनेक गझलांत हे बहुआयामित्व आढळत नाही; म्हणूनच वृत्त, मात्रा, शेरांची संख्या, ही बंधने पाळत असूनही ह्यांना गझल म्हणून मला मान्यता द्यावीशी वाटत नाही. भटांच्या सर्व गझला ह्या कसोटीवर उतरतात. अमृतराय, मोरोपंत ही तथाकथित मंडळी मला गझलकार म्हणून अजिबात मान्य नाहीत. केवळ त्यांनी गझलेचे तथाकथित यांत्रिक नियम पाळले म्हणून त्यांच्या रचनेला गझल म्हणणे हा गझलेवर घोर अन्याय आहे, असे माझे स्पष्ट मत आहे. उर्दूत मीरने एका भावाच्या गझला जरूर लिहिल्यात पण त्याचा प्रत्येक शेर त्या भावाची वेगळी व स्वतंत्र छटा घेऊन येतो, म्हणूनच त्याच्या रचना ह्या गझला आहेत. गझलेत असलेल्या बहुआयामित्वाचे महत्त्व ओळखूनच मराठीत उर्दूतल्या शेर ह्या शब्दाला 'आयाम' असा पर्यायी मराठी शब्द मला सुचवावासा वाटतो. ह्याच धर्तीवर रदीफला स्थिरयमक व काफियाला चल्यमक असे शब्द सुचवावेसे वाटतात. रदीफला अंत्य यमक किंवा काफियाला यमक हे शब्द मला योग्य वाटत नाहीत; कारण ते निश्चित भूमिका स्पष्ट करत नाहीत असे वाटते.

ह्या पार्श्वभूमीवर मी सुरेश भटांच्याप्रमाणेच रदीफ व काफिया हीं उर्दू परंपरा का प्रमाण मानतो ? सुरेश भटांनी ही परंपरा मानण्याचे कोणतेही संयुक्तिक कारण दिलेले नाही. बहुधा नेहमीप्रमाणेच इथेही परंपरा हे कारण असावे. मला व्यक्तिश: या उर्दू परंपरेशी काहीही देणेघेणे नाही. माझ्या मते रदीफ व काफिया हे गझलियतचे अपरिहार्य अंग आहे. कारण समजा एखाद्या व्यक्तीने उद्या पाच भावछटा दर्शवणारी मुक्तछंदात पाच कडवी लिहिली आणि तिला गझल हे नाव दिले तर ? इथेच रदीफ व काफियाच्या बंधनाची आवश्यकता भासते. अन्यथा गझल गझल रहातच नाही. माझ्या 'एका भारतीय विद्यार्थ्याचे उद्गार' ह्या काव्यसंग्रहात जी शेवटची कविता आहे तीत प्रत्येक वाक्य म्हणजे वेगळी भावछटा आहे आणि अशा पन्नास भावछटा तिथे एकत्र

नांदतात. ह्या भावछटांचा एकमेकांशी कसलाही संबंध नाही. म्हणजेच ह्या कवितेत बहुआयामित्व आढळते. ह्या कवितेला मग गझल म्हणावे का ? तर नाही; कारण तिथे रदीफ व काफियाचे बंधन पाळले गेलेले नाही. म्हणूनच रदीफ व काफियांनी युक्त वृत्तानुनयी (वृत्तशरण नव्हे. वृत्तानुनयीमध्ये अनुनय आहे, सक्तीचे बंधन नाही.) दोन किंवा त्याहून अधिक आयामांची एकात्म मालिका म्हणजे गझल अशी गझलेची व्याख्या करता येईल. किमान "दोन" आयाम आवश्यक; कारण त्याशिवाय बहुआयामित्व शक्य होणार नाही.

भटांच्या भूमिकेला पंथवादी म्हणण्याचे आणखी एक कारण काही गझलांबाबतीत त्यांच्या शिष्यांनी आशय वा शब्दावरून त्यांना गझल म्हणावयास दिलेला नकार. उदाहरणार्थ माझी एक गझल (त्यातील काही शेर)

*बाजारात असले काजवे खपवू नका.*
*ढुंगणाखाली अपुल्या सूर्य लपवू नका*
*तुमच्या इतिहासाला योनी नाही मुळी*
*x x x  काढून अपुले मला दिपवू नका*
*बुद्ध, फुले, बाबा इथे जन्मत राहतील.*
*तुम्ही तुमचे खाजगी झवणे सपवू नका (वगैरे)*

ही गझल गझल न मानण्याचे कारण त्यातील अश्लील शब्द आहेत. मला मात्र ही गझल गझलच वाटते. गझलेत कोणत्याही शब्दाला वा आशयाला प्रतिबंध नसावा असे माझे स्पष्ट मत आहे. ह्या गझलेचे आंतरिक नाते विद्रोही कवितेशी आहे. उर्दूत दलित कविता नाही म्हणून आपण त्या अनुभवाला नकार द्यावा असे मला वाटत नाही. माझी दुसरी गझल–

*तार्किक परिभाषा तयार होत नाही*
*ज्ञान हे अजूनही दार होत नाही*

हा शेर शेरच नव्हे असे मत ह्या पंथातील काही मित्रांनी व्यक्त केले. कारण शेर स्पष्ट नाही. वास्तविक शेर स्पष्ट आहे. आधुनिक तत्त्वज्ञानात 'तार्किक परिभाषा' तयार करण्याचा विसाव्या शतकात जोरदार प्रयत्न झाला. दुर्दैवाने तो फसला. त्यामुळेच ज्ञानाचा दरवाजा होऊन सत्याच्या घरात रहायला मिळेल ही अपेक्षा फळली नाही. आता जर कंपूला तार्किक परिभाषा हे प्रकरण नेमके काय हे माहीत नसेल तर तो दोष कवीचा कसा ? असो.

सुरेश भटांनी गझलेविषयी आपली भूमिका मांडताना 'उपनाम' वापरायला विरोध केला होता. पूर्वी स्वत:ची ओळख रहावी व गझल कुणाची हे कळावे म्हणून उपनाम होते असे त्यांचे ह्याबाबतचे स्पष्टीकरण ! ते कुणालाही मान्य व्हावे. आपल्याकडेही 'तुका म्हणे' ही परंपरा आहेच. पण उपनाम हे केवळ एवढेच कार्य करते का ? अनेकदा उपनाम हे स्वत:शी साधलेल्या संवादाला एक तरलता प्राप्त करून देते.

*इश्कने हमको निकम्मा कर दिया*
*वर्ना हम भी आदमी थे काम के*

ह्या शेरापेक्षा

*इश्कने गालिब निकम्मा कर दिया*
*वर्ना हम भी आदमी थे कामके*

हा शेर उपनामाच्या वापरामुळे अधिक तरल वाटतो. आपण विचार करतानाही 'श्रीधरराव, आज काही तुमचं खरं नाही' अशा पद्धतीने विचार करतो. ह्या पद्धतीत आपण आपल्या देहाला आत्म्यापेक्षा वेगळे काढतो. त्यामुळे एकाच वेळी तटस्थता आणि आपलेपणा आढळतो आणि त्यामुळे आशय अधिक गडद होतो.

*जिनके लिये पागल हुअे सयाने बनकर पूछते है*
*वो बेचारा पागल कोई कैसे इश्क करे श्रीधरसे ?*

अशा पद्धतीच्या शेरात तर श्रीधर हे उपनाम अपरिहार्य ठरते. तेव्हा उपनाम जर आशयाचा भाग बनून येत असेल तर ते स्वीकारावे असे मला वाटते.

सुरेश भटांच्या गझलेचा आणि त्याविषयक त्यांच्या दृष्टिकोनाचा विचार केल्यानंतर इतर मुद्द्यांकडे येतो. भटांनी इस्लाह पद्धतीचा पुरस्कार केला आहे. भारतात तर ही पद्धत शिक्षणपद्धतीचा मुख्य आधारस्तंभ होती. गुरुमंत्र हा शिक्षणपद्धतीचा अपरिहार्य भाग होता. बदलत्या काळात ही पद्धत बदलली; कारण छपाईच्या शोधामुळे जो गुरुमंत्र घेण्यासाठी गुरूकडे जाणे पूर्वी अपरिहार्य ठरत असे ती अपरिहार्यता आता राहिलेली नाही असे मला वाटते. मला व्यक्तिश: भटांकडे जाण्याची कधीच गरज भासली नाही. तेव्हा इस्लाह अपरिहार्य मानण्याची कसलीही गरज नाही. अगदी सुरेश भटांची गझलेची बाराखडी वाचूनही गझल म्हणजे काय ते कळू शकते. सुरेश भट गझलेची प्राध्यापकगिरी करत असतील तर त्याला माझा आक्षेप नाही; पण ते त्यातून एक संकुचित दृष्टी देत असतील तर त्यांच्याशी मतभेद नोंदवणे गरजेचे वाटते. कारण गुरू आला की

त्याबरोबर बुवाबाजी अपरिहार्यपणे येते. भटांच्या बाबतीत हे घडू लागलेले दिसते म्हणून विरोध करावासा वाटतो. ज्या दृष्टिकोनातून भटांना उपनामाची पद्धत स्वीकारण्याची गरज वाटत नाही त्याच दृष्टिकोनातून मला 'इस्लाह' स्वीकारण्याची गरज वाटत नाही. तरीही आशयाचा अपरिहार्य भाग म्हणून उपनाम येत असेल तर उपनाम स्वीकारायला हरकत नाही. तसेच जीवनाची, स्वत:ची गरज म्हणून भटांना गुरू स्वीकारणे आवश्यक वाटत असेल तर तसे करायला माझी हरकत नाही. पण एखादा उपनाम वापरतो म्हणून त्याला गझलकार न मानणे हे जसे मूर्खपणाचे होईल, तसेच एखाद्याने भटांना नाकारले म्हणून त्याला गझलकार न मानणे हेही मूर्खपणाचे होईल. सुरेश भटांचे व्यक्तिमत्त्व व प्रभाव इतका जोमदार आहे की भटांच्या शिष्यवरांत ताकदीने मुक्तछंदात लिहिणारा कवी आज दिसत नाही, इतका त्यांचा शिष्य गझलेत अडकून पडलेला दिसतो. सुरेश भटांनी आमच्या पिढीचे नुकसान केले असे मी म्हणतो तेव्हा भटांच्या शिष्यांची ही वाताहत अभिप्रेत असते. श्रीराम पंचिद्रेसारख्या उत्तम निसर्गकवीची बीजे असलेल्या माणसाला गझलेच्या साच्यात अडकून पडल्याने उत्तम निसर्गकवितेला पारखे होण्याची वेळ आलेली मला दिसते. त्याला व्यक्तिश: हे मान्य नाही, पण त्याच्या पूर्वीच्या कविता मी ऐकल्या आहेत आणि मला तीव्रतेने ती धार गेली असे वाटते. दुसरी गोष्ट ह्या शिष्यवरांनी विसाव्या शतकातील आशयाच्या आधुनिकीकरणाकडे पूर्णपणे पाठ फिरवलेली दिसते. गझलेचा तांत्रिक आकृतिबंध गिरवण्यात अडकून पडलेली ही प्रतिभा ज्या दिवशीं मुक्त होईल तो सुदिन होय. अनेकांची गझल ही वृत्ती नसूनही हे लोक मोडकीतोडकी केविलवाणी गझल लिहिताना दिसतात. कदाचित ह्यातील कवींत उत्तम मुक्तछंद लिहिण्याची क्षमता असू शकेल. ही प्रतिभा गझलेत काही कर्तृत्व न गाजवता संपून जाण्याची भीती वाटते. गझल सादर करण्याचा कैफ मी स्वत: अनुभवलेला आहे. पण हा कैफ त्या माणसाला मर्यादित करू शकतो. एकाच दुर्बिणीतून जग पाहणे शेवटी तुम्हाला मर्यादित करते. गझलेबाबत हे घडलेले आहे. दशकाच्या कवींपैकी अशोक बागवे हादेखील असाच एक बळी वाटतो. त्याच्या कवितेत नंतर रोमॅन्टिसिझम वाढत गेलेला दिसतो आणि हा गझलेचा अप्रत्यक्ष परिणाम वाटतो. (अर्थात इतर अनेक कारणेही असतीलच.)

गझलेत आधुनिक जीवनाची, त्यातील आशयाची व्यामिश्रता व्यक्त होणे अशक्य आहे. कारण एका शेरात ही गुंतागुंत पकडताच येत नाही ह्या माझ्या म्हणण्याला ह्या संप्रदायाने हरकत घेतलीये; पण ही गुंतागुंत कशी काय गझलेने पकडून दाखवली हे भटांनी किंवा त्यांच्या शिष्यांनी जरा विस्तृतपणे सांगितले असते तर बरे झाले असते. त्याला समर्थन म्हणून गालिब, साहिर, शकील, दुष्यंतकुमार यांची नावे घेतली जातात. बहुदा ह्या कवींनी ही व्यामिश्रता व्यक्त केली

असे यांना म्हणावयाचे असते. मला लक्षात आलेली गोष्ट अशी की, सुरेश भट व त्यांच्या शिष्यांना गझलेचे सामर्थ्य कळलेले आहे, पण विसावे शतक ही चीज किती क्लिष्ट आहे हे बहुदा कळलेले नाही. त्यामुळेच गझलेच्या मर्यादा त्यांच्या लक्षात येत नाहीत. गेल्या पाच हजार वर्षात मानवाने जगाविषयी जे ज्ञान संशोधित केले त्याच्या कित्येक पट ज्ञान व संशोधन एकट्या विसाव्या शतकात मिळालेले आहे. ह्यासाठी आपण विसाव्या शतकावरील गझलच घेऊ.

*बोललो इथे जे जे मी ते जरी महान होते*
*फुलांना ऐकावयाला पण कोठे कान होते*

*तो मुळी नव्हता क्रूस नव्हत्या बंदुकीच्या गोळ्या*
*ईश्वराचे केलेले चुकीचेच निदान होते*
*शतकामध्ये ह्या मुळी मृत्यू आहे.साठलेला*
*जिथे जातो तिथे कसे आपोआप स्मशान होते*
*वसंतांनो नका बोलवू कृपया मला बागेत*
*मी येणार हे कळताच फुलांचे प्रस्थान होते*
*सांगू नकोस तू शाश्वत कोठलीच इथे तत्त्वे*
*हरेक धर्मग्रंथाचे अखेर सत्तास्थान होते*
*हरेक घराजागी आज इमारत उठते आहे*
*तळमजल्यावर हरेक रोज नवे दुकान होते*
*आतडे बावीस फुटी आणि टाहो दोन-चार*
*जन्मलो तेव्हा सोबत एवढेच सामान होते*
*ती मुळीच नव्हती पूजा थोर महापुरुषांची*
*पांगळ्यांचे अंधानी केलेले सन्मान होते*
*काळाशार मेघ अन् पाऊस मात्र कुठे नाही*
*रोजचेच हे राजकीय म्हणे हवामान होते*
*नवीन ह्यांना काय सांगू 'श्री' आता तूच सांग*
*जिथे जातो तिथे फक्त तेच पुनरुत्थान होते*

पहिला शेर हा कम्युनिकेशन गॅपवर आहे; पण संवाद लोपाच्या किती आयामांना हा शेर

कवटाळतो ? दुसरा शेर ख्रिस्त ते गांधी यांच्या हत्येवर कितपत प्रकाश टाकतो ? ईश्वराचे झालेले विकृतीकरण त्यात कितपत उतरते ? ते पुरेसे आहे का ? तिसरा शेर तर अस्तित्वाच्या नासाडीवर प्रखर भाष्य करतो. पण वसंत डहाकेंच्या कवितेतील आशयाच्या मानाने तो किती ढोबळ वाटतो ? पाचव्या शेरात धर्माची झालेली संस्थाने पूरेपुर व्यक्त होतात का ? विसाव्या शतकात घराजागी इमारत येऊन आयुष्याचे जे बाजारीकरण होते ते सहाव्या शेरात संपूर्ण कवटाळले जाते का ? आठव्या शेरात व्यक्ति महात्म्य आणि पुजारी व अनुयायी यांचा जो संबंध आहे त्याची जटिलता व्यक्त होते का ? नववा शेर आजचे राजकीय हवामान अचूक सांगतो, पण तुळशी परबच्या सखोल जाणिवेच्या मानाने ते किती मर्यादित वाटते ? शेवटच्या शेरात जीवनातली पुनरुत्थानातील पुनरावृत्ती व सृजनाचा लोप पूर्णपणे व्यक्त होतो का ?

विसावे शतक हे अवाढव्य माहितीचे व घनदाट तपशीलांचे शतक आहे. यंत्रामुळे व ज्ञानामुळे सर्व समाजरचनाच ह्या शतकाने बदलली. मानवाचे स्वत:विषयीचे ज्ञान अफाट वाढलेले आहे. मनाच्या गुप्त, सुप्त आणि प्रकट ह्या तिन्ही स्तरांचे आकलन व आदिबंधाचा शोध ह्यामुळे व्यक्तिमत्त्वाकडे बघण्याची नजर साफ बदललेली आहे. अशा वेळी हे सर्व तपशील केवळ दोन ओळीत सामावले जातात असे जर भटांना व त्यांच्या शिष्यवृदांना वाटत असेल तर ते स्वत:ची व त्याचबरोबर इतरांचीही घोर फसवणूक करत आहेत असे म्हटले पाहिजे. एकोणिसाव्या व विसाव्या शतकात झालेल्या बदलामुळेच आशयाबाबत कवींना वेगळे प्रत्यय येऊ लागले. जर पारंपरिक काव्यप्रकारात हा आशय व्यक्त करता आला असता तर ह्या शतकात जगातील सर्वश्रेष्ठ कवींनी जे अभिव्यक्तींचे नवीन नवीन फॉर्म्स शोधले किंवा परंपरागत फॉर्म्सची जी मोडतोड केली ती केलीच नसती. मुक्तछंदाचा जन्म झालाच नसता. आता जगातले हे सर्व कवी मूर्ख आणि भट मात्र शहाणे असे जर त्यांच्या शिष्यवरांना वाटत असेल तर डबक्यात राहून डबक्यालाच समुद्र मानणाऱ्या बेडकासारखी त्यांची अवस्था आहे, असे खेदाने म्हणावे लागेल. बेडूक कितीही फुगला तरी त्याचा बैल होऊ शकत नाही, तसेच शेर कितीही फुगला तरी तो विसावे शतक कवटाळू शकत नाही.

*जागोजागी मंबाजींना कीर्तने करू द्या.*
*विठू काय बेमानांना पावणार आहे*

हा शेर कितीही थोर असला तरी दिलीप चित्रेंच्या 'कवितेनंतरच्या कविता'मध्ये सर्वात शेवटी पंढरपूरवर लिहिलेल्या कवितेचा आशय ह्या एका शेरात सामावणे शक्य नाही. ही मर्यादा

भटांची नाही तर गझलेचीच आहे. शेवटी वन डे क्रिकेट आणि कसोटी सामना यांच्यात जो फरक असतो तोच इथे आहे. एखादा फलंदाज वन डेत चांगला स्कोर करतो म्हणून थोर होत नाही. शेवटी त्याचा खरा कस कसोटीतच लागतो. गझल म्हणजे काही वन डे एकत्र गुंफणे होय; पण पाच वन डे एकत्र आले तरी त्यातून कसोटीचा अनुभव मिळत नाही; किंवा चार एकांकिका सलग पाहिल्या म्हणून संपूर्ण नाटकाचा प्रत्यय येऊ शकत नाही. ह्या मर्यादा वन डेच्या आणि एकांकिकेच्या चिंचोळ्या अवकाशाच्या आहेत आणि त्या स्वीकारण्यातच शहाणपण आहे असे मला वाटते. शेवटी कादंबरी ती कादंबरी आणि कथा ती कथाच. पाच कथा एकत्र लिहिल्या म्हणून काही कुणी कादंबरीकार होऊ शकत नाही. मानसशास्त्रीय परिभाषा वापरायची तर मी म्हणेन की गझल ही केवळ प्रकट मनच आविष्कृत करते, तर चित्र्यांची आणि कोलटकरांची कविता ही गुप्त, सुप्त आणि प्रकट अशा तिन्ही स्तरांना कवटाळते. म्हणूनच हे कवी थोर आहेत आणि भट हे केवळ चांगले कवी आहेत. मी तर ह्यापुढे जाऊन म्हणेन की, अरुणा ढेरे, विवेक राजापुरे किंवा अरुण म्हात्रे हे अलीकडील कवीदेखलि कवी म्हणून सुरेश भटांच्यापेक्षा श्रेष्ठ आहेत. आधुनिक जीवनाची व्यामिश्रता पकडली म्हणून अनेकदा गालिब, शकील, साहिर, दुष्यंतकुमार यांची उदाहरणे दिली जातात आणि त्यांची ताकद ओळखता आलेली नाही अशी टीका केली जाते. भटांच्या समर्थकांना ह्या कवींची ताकद ओळखता आलेली दिसत नाही; कारण ताकद ओळखणारा माणूस त्या माणसाची ताकद कुणापेक्षा जास्त आणि कुणापेक्षा कमी ह्या दोन्ही गोष्टी ओळखतो... ह्या कवींची थोडी चर्चा करू.

ह्यातील मिर्जा गालिब २७ डिसेंबर १७९७ साली जन्मला व १५ फेब्रू. १८६९ ला वारला. इंग्रज ह्या काळात भारतात स्थिरावले. गालिबने १८५७ चे बंडही बघितले. पण इंग्रजांच्या आगमनामुळे भारतीयांच्या जीवनात जी आधुनिकता आली ती बघायला गालिब जिथे स्वतःच जिवंत नव्हता तिथे तो ती अविष्कृत काय करणार ? गालिबची गझल ही 'इश्क' 'बन्दीगी' आणि 'सूफी काफ़िरी' ह्या त्रिकोणातच फिरत रहाते. मात्र गालिबने हे तिन्ही कोन अतिशय प्रभावीपणे व्यक्त केले. त्यामुळेच तो महान गझलकार ठरला. नंतरच्या काळात 'इन्कलाब' हा चौथा कोन उर्दू शायरीला मिळाला. तरीही जगातील इतर भाषांशी तुलना करता उर्दू गझलेत आधुनिकीकरणाची सूक्ष्म आंदोलने ध्वनित झालेली दिसत नाहीत. ती व्यक्त करण्यासाठी नज्मचा वापरच अधिक झालेला दिसतो. उर्दू गझल ही प्रामुख्याने 'इश्क' 'बन्दगी' आणि 'सूफी काफिरी' 'इस्लामी सुधारणावाद' व स्वातंत्र्याची चळवळ, मार्क्सवादी डावा 'इन्किलाब' यांच्यात घुमताना दिसते. शकील बदायुनीची मजल 'इश्क' पलीकडे फारशी गेलेली नाही, तिथे त्याच्या आधुनिकीकरणाविषयी

काय लिहिणार ? मात्र तो ताकदीचा गझलकार होता ह्याविषयी शंका नाही. साहिर लुधियानवीने फिल्मी गझलाच लिहिल्या आणि आपल्या हिंदी फिल्म्सच्या गजलेविषयी फार काही लिहावे असे मला वाटत नाही. त्याच्या काव्यसंग्रहातल्या गझलांची संख्या धड डझनदेखील नाही. साहिरने 'इन्किलाब' मात्र प्रभावीपणे व्यक्त केला, मात्र त्याची अभिव्यक्तीही नज्ममधून झाली. कैफी आझमींनी म्हटल्याप्रमाणे रोमॅन्टिक धुक्यातून साहिरचा इन्कलाब कधीच मुक्त झालेला दिसत नाही. दुष्यंतकुमार हा मात्र हिंदीतला एक अतिशय समर्थ गझलकार. अस्तित्ववादी परात्मतेच्या अनेक छटा त्याच्या गझलेत प्रभावीपणे उमटल्यात. मात्र त्यांची गझल व त्यातील आशयाला, त्याच्या फलकाला गजानन मुक्तिबोध; केदारनाथ सिंह, सर्वेश्वर सक्सेना, चंद्रकांत देवताळे आदी कवींच्या आशयासमोर व फलकासमोर उभे केले तर काय दिसते ? भटांची जी अवस्था चित्रे, कोल्टकर, ढसाळ यांच्या तुलनेत होते तीच त्याचीही होते. मात्र अस्तित्ववादाच्या आधुनिक भावांशी त्याची गझल निगडित असल्याने भटांपेक्षा त्याची गझल आधुनिक वाटते. (भट प्रामुख्याने इश्क आणि इन्कलाब ह्या दोन कोनातच घुटमळताना दिसतात ही त्यांची मर्यादा आहे.) भटांना आधुनिक आशयद्रव्य ही चीजच कळलेली दिसत नाही असे वाटते. विसाव्या शतकाविषयी मी जे लिहिले त्यात थोडीशी भर टाकून मी हा मुद्दा संपवतो. आधुनिक आशयद्रव्य म्हणजे 'शहरी जीवन व समस्या' यांचा विस्तारित चाललेला फलक, आत्मसंवाद, निसर्गसंवाद यांचा झालेला लोप, परात्मता किंवा आत्मदुरावा, मन व शरीर व भौतिक जग यांच्याविषयी वाढत चाललेल्या ज्ञानाचे मानवी जीवनावर पडलेले ताण, दाब व वजन, मानवी मनाची छिन्नमनस्कता व खंडितता, जीवनातील वाढते यांत्रिकीकरण व कंटाळ्याचा वाढता प्रभाव व दाब, ईश्वराचा झालेला मृत्यू व त्याला पर्याय न सापडल्याने अंतिम सत्याविषयी निर्माण झालेला असंगत दृष्टिकोन, आयुष्यातील निरर्थकता, वैफल्य व विसंगती, शासनसंस्थेचा वाढता प्रभाव, तिची बळजबरी आणि तिने चालवलेली अपरंपार फसवणूक. आधुनिक अर्थव्यवस्थेतून संपूर्ण जीवनालाच प्राप्त झालेले बाजारी स्वरूप आणि केवळ एकमेकांचे हित सांभाळण्यासाठी जुळणारे व तुटणारे नातेसंबंध वगैरे वगैरे. भटांच्या शिष्यांसाठी ही यादी पुरेशी आहे. ह्या सगळ्याचे केवळ ढोबळ नव्हे तर सूक्ष्म, सखोल आणि मर्मभेदी आकलन हे आधुनिक कवितेचे वैशिष्ट्य आहे. मराठीतील दिलीप चित्रे, डहाके, कोल्टकर, ढसाळ आदी प्रभृतीपासून ते अलीकडेच ज्यांना नोबेल मिळाले ते वॉलकॉट किंवा आक्टोव्हिया पॉझपर्यंत सर्वांनी हे आधुनिक भान आपल्या कवितेत कसोशीने सांभाळले आहे. एकीकडे वॉल्कॉटसारखा कवी छापील जवळ जवळ चारशे पाने भरतील अशी महाकाव्यात्मक कविता करूनही मी आधुनिक काळ आणि परंपरा नीट व्यक्त करू शकलो नाही अशी खंत

बाळगत असतानाच आमच्याकडील भट व त्यांचे शिष्य मात्र चुटकीसरशी एका शेरात किंवा गझलेत विसाव्या शतकातील जीवन कवटाळल्याच्या ब्रह्मानंदात डुंबत असतात. ह्याला करंटेपणा म्हणावे नाहीतर काय म्हणावे ? कृपया मी वैयक्तिक टीका करत नाहीये हे पुन्हा लक्षात घ्यावे. मी टीका करतो तिचा उद्देश मराठी कवींनी आकाशात भराऱ्या घ्याव्यात अशी माझी सुप्त इच्छा आहे म्हणून ! मला खरोखरच ह्यामुळे तरी निदान गझल लिहिणारे लोक विचार करतील असे वाटते. मात्र माझा गझललेखनाला विरोध नाही हे मी प्रामाणिकपणे सांगू इच्छितो. भटांच्या शिष्यांनी गझल लिहावीच, पण चित्र्यांसारखी, डहाकेसारखी मुक्त कविताही लिहावी. शेवटी गझलेचीही एक ताकद आहे. 'दिवानगी' व्यक्त करायला गझल फार सशक्त बळ देते हा माझा अनुभव आहे. 'सुफी काफिरी व बन्दगी' ही तर गझलेची एक विशेष खासियत. दुर्दैवाने मराठी गझल ही भटांसारख्या नास्तिक माणसाच्या हाती पडल्याने त्यांना तिचे बळ कळलेले नाही. खुद्द आधुनिक उर्दूतल्या कवींनाही 'मय', 'साकी', 'मयखाना' यांचे सूफी परंपरेतील घनदाट अर्थ कळलेले नाहीत. त्यांनी ह्या मयखान्याचा (जिथे खुदा हाच साकी असतो) चक्क दारूचा गुत्ता केलेला दिसतो. त्यामुळे वाजिद, शेख वगैरेचा टाविक उपहास करण्याच्या गिरमिटातून त्यांची गझल फिरत रहाते. त्यामुळेच उर्दू आणि मराठी अशा दोन्ही गझल ईश्वरासंदर्भात आज सखोल काही व्यक्त करण्यात अयशस्वी आहेत. इस्लामला God is dead हे नित्शेचे वचन मानवणार नाही. ह्यामुळे उर्दूत ह्या बाबतीत काही आशा नाही आणि मराठीत भटांच्या नास्तिकपणाचा प्रभाव त्यांच्या शिष्यांवर असल्याने (अर्थात वैयक्तिक आयुष्यात सूफीवाद असेलही, पण गझलात तो प्रकट होत नाही. कारण भटांनी आपल्या शिष्यांना बहुदा सूफीवाद समजावला नसावा किंवा त्याची ताकद दोघांनाही पुरती समजलेली नसावी) ही शक्यता मावळलेली ! ईश्वराचा मृत्यू झालाय ह्या आधुनिक सत्याची सांगड सुफीच्या मयखाना (खुदाई), मय (ब्रह्म) आणि साकी (खुदा) यांच्याशी घालून गझल लिहिणे अवघड नाही. उदाहरणार्थ, माझी ईश्वराच्या मृत्यूनंतर ईश्वराला उद्देशून लिहिलेली एक गझल.

*तू था तो कितना अच्छा था मैं, तू नही तो वैसे बुराभी नही हूँ*
*तेरे साथ मैं भी खुदा था पहले, अब तो मैं इन्सान सादाभी नही हूँ ।*
*तू साथ था तो लगता था पहले, दोनों जहाँ मेरी जुनूँमें शामिल*
*जन्नत का ख्वाब खत्म हो गया अब ! दोजखकी हकिकतसे जुदा भी नही हूँ।*
*तेरे साथ खिलते थे गुचे ये पहले, तेरे साथ होती थी गुलशन ये दुनिया*
*सुक्ष्मदर्शीसे अब देखता हूँ कुदरत ! फिरभी फुलोंसा महका भी नही हूँ।*

*तेरे साथ गाता था मस्ती की ल्य, तेरे साथ बनता था मैं भी 'मय'*
*होश आजभी बारमें खो बैठता हूँ, फिर भी नशेसे भरा भी नही हूँ।*
*तेरे साथ काबा का पत्थर था खुदा तेरे साथ मथुरा की मूरत थी 'श्रीधर'*
*तेरा साथ छुटा तेरे मरने के बाद, तेरी तरह फिर भी मरा भी नही हूँ।*

भटांचे शिष्य ह्यानंतर तरी गालिबच्या त्रिकोणातील बन्दगी आणि सूफी काफिरी ह्या दोन कोनांचा गांभिर्याने विचार करतील का ? मला इथे अनुकरण करा असे बिल्कुल सुचवायचे नाही. उलट माझा त्याला विरोधच असेल; पण मराठी गझल समृद्ध करण्यासाठी ह्या दोन कोनांची अत्यंत आवश्यकता आहे असे मला वाटते. केवळ चांदण्यावरील तरंगांच्या आणि बदनाम झंझावाताच्या ठराविक गिरमिटात फिरून मराठी गझल समृद्ध होणार नाही. त्यासाठी वरील दोन कोनांचीही गरज आहे. गझल लिहिणे येरागबाळ्याचे काम नोहे हे खरेच, पण भटांच्याकडे राहून गझलांच्या बाराखड्या गिरवल्या म्हणून गझल जमेल ह्याही भ्रमात कुणी राहू नये. गझलेचे तंत्र म्हणजे गझल नव्हे तर गझलेचा कलंदर आशय व तिची बहुआयामता म्हणजे गझल होय. सुरेश भट त्यांच्या शिष्यांना ह्या बहुआयामतेऐवजी तंत्रच अधिक शिकवतात. म्हणूनच आज त्यांच्या शिष्यांच्या गझला स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाच्या न वाटता भटांच्या गझलांच्या पडछाया वाटतात, ह्यात भटांचे नुकसान काहीच नाही. उलट इतिहास नंतरच्या पिढीवर प्रचंड प्रभाव टाकणारा गझलकार म्हणून त्यांची नोंद करील आणि भटांच्या शिष्यांना मात्र गझलेच्या इतिहासात काहीच स्थान असणार नाही. रविकिरण मंडळाबाबत माधव ज्युलियन हा फक्त रवी, उरलेले किरण ही जशी अवस्था होती तशीच इथे भट सूर्य आणि बाकीचे किरण अशी अवस्था येईल. (किंवा बाकीचे फार फार तर चंद्र)

वरील सर्व विवेचनावरून भटांना गझलेची मर्यादा कळली नाही किंवा त्यांनी आमच्या पिढीचे नुकसान केले ही विधाने मी का केली हे कुणाच्याही सहज लक्षात येईल. 'ह्या लोकांच्या गझला कुणी छापत नाही म्हणून हे लोक टीका करतात' अशी टीका नेहमीच केली जाते. एखाद्या माणसाचा विचार खोडता आला नाही की त्याला वैयक्तिक टीकेच्या चिखलात ओढायचे आणि घाण करायची ही महाराष्ट्राची प्राचीन सवय आहे. तेव्हा अशा टीकेला प्रतिक्रिया देऊन भटवादी लोकांशी चिखलाचा झिम्मा किंवा फुगडी खेळावी असे मला वाटत नाही. 'गझल जमत नाही म्हणून हे लोक मुक्तछंद श्रेष्ठ मानतात' अशीही अनेकदा टीका केली जाते आणि मला वाटतं मीच काय, इक़बाल, गालिब आणि भटांचा लाडका फैज देखील इतर काव्य-प्रकाराकडे वळलेत.

त्यांना गझल जमत नव्हती म्हणून ते तिकडे वळले असे भटांना म्हणायचे आहे काय ?

भटांच्या योगदानाबाद्दल आपण आभारी असायलाच हवे हे कोणीही मान्य करेल. भटांच्यापूर्वी गझल होती पण टणत्कार मात्र भटांच्यामुळेच मराठीत घुमला. एक गोष्ट इथे जाता जाता सांगायलाच हवी. भट म्हणतात तशी भटांची उपेक्षा मराठीत कधीच झाली नाही. लोकप्रियता, राज्य पुरस्कार आणि लाईमलाईट ह्या तिन्ही गोष्टी त्यांना सहज मिळालेत. मराठीत एवढे यश त्यांच्या पिढीत कुणालाच मिळालेले दिसत नाही. उलट त्यांचे समकालीन दिलीप चित्रे, अरुण कोल्टकर, मन्या ओक वगैरेंची नावेदेखील ह्या करंट्या महाराष्ट्राला माहीत नाहीत. भटांनी गझलेकरता जे सोसले त्यापेक्षा अधिक ह्या लोकांनी कवितेसाठी भोगले आहे. उपेक्षा भटांची नव्हे तर ह्या लोकांची झाली. ह्याबाबतीत भटांची अवस्था 'ज्याला सारे मिळाले तो ओरडाया लागला' अशीच आहे. अर्थात भटांना जे मिळाले ते मिळवण्याची त्यांची पात्रता आहे हे कुणीही मान्य करेल. शेवटी भटांच्या सर्व शिष्यांना व भटांना हेच सांगणे आहे-

*कोणीच बनू नये प्रेषीत गझलांचे*
*जगत जावे जगणे वेधीत गझलांचे*

*आम्ही स्थिरच राहू तुम्ही म्हणत रहा*
*माकडाहाती दिले कोलीत गझलांचे*

*तुमच्या आभाळास पाहू मी कशास*
*जगतो खिशात सूर्य टाकीत गझलांचे*

*कोठारावर आताच चर्चा नका करू*
*अजून क्षेत्र आहे ओलीत गझलांचे*

*गरज कुणास आहे तुझ्या 'श्री' ओळींची*
*उपहास हेच आहे फलीत गझलांचे*

